**नाबार्ड अर्थसहाय्यित ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापनासाठी ग्रामीण पायाभूत विकास निधी-१९ (RIDF-XIX) अंतर्गत मंजूर असलेल्या २८ गावांच्या प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देणे.**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः नाबार्ड १५१४/प्र.क्र.१६/पापु-०८

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: ८ एप्रिल, २०१५.

**वाचा:-**

१) शासन निर्णय क्रमांकः पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्र.संस्वअ-२०११/प्र.क्र.२२८/पापु-१६, दि.२९.०३.२०१२

२) शासन निर्णय क्रमांकः महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांचे दि.११.२.२०१४ व दि.०९/०४/२०१४ चे पत्र.

३) शासन निर्णय क्रमांकः नाबार्डकडील पत्र क्र.NB/SPD/३०२७१/१०५/RIDF XIX/(Maharashtra)/१४१/PSC/१३-१४, दि.४.३.२०१४ चे पत्र.

४) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग, क्र. नाबार्ड-२०१३/प्र.क्र.२२/अर्थबळ, दि.५.३.२०१४

५) शासन निर्णय क्रमांकः पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्र. नाबार्ड-२०१४/प्र.क्र.०४/पापु-०८, दि.१४.०८.२०१४.

**प्रस्तावना:-**

राज्यातील ग्रामीण भागातील १५,००० व त्यापेक्षा अधिक लोकसंख्या असलेल्या २८ गावांत नाबार्ड अर्थसहाय्यित ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्प राबविण्याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत सादर केलेल्या प्रस्तावास दि.१४ ऑगस्ट, २०१४ च्या संदर्भीय शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील अट क्र.४ "२८ गावांमध्ये घनकचरा व्यवस्थापनाचा घटक पूर्ण करुन हा प्रकल्प राबविण्यात यावा" अशी अट घालण्यात आली होती. सदर प्रकल्पांमध्ये घनकचरा व्यवस्थापनाचा घटक पूर्ण करण्यासाठीची कुठलीही तरतूद नाही. तसेच घनकचरा व्यवस्थापनाची कामे करावयाची झाल्यास, त्यास अतिरिक्त खर्चाची स्वतंत्र तरतूद करावी लागेल, तसेच प्रकल्प पूर्ण करण्यास विलंब होईल. नाबार्डच्या दि.९.३.२०१५ च्या पत्रान्वये मुदतवाढ देण्यात आली असून, सदर मंजूर २८ प्रकल्प सन २०१६-१७ पर्यंत पूर्ण न झाल्यास प्रकल्पांची मान्यता रद्द होणार आहे. याबाबी लक्षात घेऊन दि.१४.८.२०१४ रोजीच्या शासन निर्णयातील अट क्र.४ शिथील करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

नाबार्ड अर्थसहाय्यित ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापनासाठी ग्रामीण पायाभूत विकास निधी-१९ (RIDF-XIX) अंतर्गत मंजूर २८ गावांना दि.१४.८.२०१४ अन्वये देण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या शासन निर्णयातील क्र.४ येथील "२८ गावांमध्ये घनकचरा व्यवस्थापनाचा घटक पूर्ण करुन हा प्रकल्प राबविण्यात यावा" ही अट शिथील करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०८१४५६०१३९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jirgale Sarita D

Digitally signed by Jirgale Sarita D
DN: CN = Jirgale Sarita D, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.04.17 15:30:31 +05'30'

( स. दि. जिरगाळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता, मंत्रालय,मुंबई यांचे खाजगी सचिव
४. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मुंबई
८. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
१०. विभागीय आयुक्त (सर्व)
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
१३. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
१४. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो), बेलापूर, नवी मुंबई
१५. प्रबंधक, नाबार्ड, पुणे
१६. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती, पापु-०८.